**बाल कामगार प्रथेचे उच्चाटन करण्याच्या हेतूने या अनिष्ट प्रथेविरोधात जाहिरात व प्रसिध्दीकरिता सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता कामगार आयुक्त कार्यालयांतर्गत येणाऱ्या विभागीय व जिल्हास्तरीय कामगार कार्यालयांना निधी उपलब्ध करुन देणेबाबत--**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएलए-२०२०/प्र.क्र.४५ /कामगार-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा** :- (१) शासन परिपत्रक, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक : अर्थसं-२०१९/२०१९-२०२०/(प्र.क्र.३५) प्रशासन-१, दिनांक १७.०७.२०१९.
(२) कामगार आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. काआ/ग्रावि/बाका/जाहिरात/२०१९-२०/कार्या-१२, दि.२४.११.२०१९.
(३) कामगार आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. काआ/बाका/जाहिरात/२०१९-२०/ कार्या-१२, दि.०१.०२.२०२०.

**प्रस्तावना :-**

बाल व किशोरवयीन कामगार (प्रतिबंध व नियमन) अधिनियम,१९८६ (सुधारित अधिनियम २०१६) नियम,१९८८ मधील नियम २अ अन्वये व्यापक प्रसिध्दीकरिता तरतूद करण्यात आलेली आहे. मा.उच्च न्यायालय,मुंबई यांनी जनहित याचिका क्र.२६/२०११ मध्ये दिनांक ०८.०२.२०१८ रोजी दिलेल्या आदेशाद्वारे अधिनियमाची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याचे आदेश दिलेले आहेत.

२. बाल व किशोरवयीन कामगार प्रथेचे समूळ उच्चाटन करण्यासाठी जाहिरातीच्या माध्यमातून जनसामान्यांपर्यंत पोहोचणे आणि जनसहभागातून ही प्रथा नष्ट करणे या उद्देशाने सदर योजनेची जाहिरात प्रसिध्द करण्यासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता रु.३,००,००,०००/- कोटी एवढया रक्कमेचा नियतव्यय संदर्भ क्र.१ नुसार मंजूर केला असून त्यापैकी ६० टक्के म्हणजेच रु.१,८०,००,०००/- इतकी रक्कम संगणक प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आली आहे.

३. सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता बाल कामगार या अनिष्ट प्रथेविरोधात व्यापक प्रमाणात जनजागृती करण्याकरिता जाहिरात, प्रचार व प्रसिध्दी करण्यासाठी माध्यम आराखडा प्रस्तावित आहे. याशिवाय कामगार आयुक्त कार्यालयाने उपरोक्त संदर्भिय क्र.३ च्या पत्रान्वये कामगार आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य यांनी त्यांचे कार्यालयाच्या अंतर्गत येणाऱ्या विभागीय व जिल्हास्तरीय कामगार कार्यालयांना (राष्ट्रीय बाल कामगार प्रकल्पाच्या कक्षेत समाविष्ट असलेले जिल्हे व इतर जिल्हे) त्यांच्या कार्यकक्षेतील स्थानिक स्तरावर बाल कामगार प्रथेचे उच्चाटन करण्याच्या हेतूने या अनिष्ट प्रथेविरोधात जाहिरात व प्रसिध्दी करण्याकरिता रु.३६,००,०००/-

इतक्या रक्कमेच्या खर्चास मान्यता मिळणेबाबत सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याप्रमाणे शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता रुपये ३,००,००,०००/- कोटी एवढया रक्कमेचा नियतव्यय मंजूर केला असून त्यापैकी ६० टक्के म्हणजेच रुपये १,८०,००,०००/- इतकी रक्कम संगणक प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आली आहे.

२. या अनुदानातून कामगार आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य या कार्यालयाच्या अंतर्गत येणाऱ्या विभागीय व जिल्हास्तरीय कामगार कार्यालयांना त्यांच्या कार्यकक्षेतील स्थानिक स्तरावर बाल कामगार प्रथेचे उच्चाटन करण्याच्या हेतूने या अनिष्ट प्रथेविरोधात जाहिरात व प्रसिध्दी करण्याकरिता रक्कम रु.३६,००,०००/- खर्च करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

३. कामगार आयुक्त यांनी सदर कार्यक्रमाची अंमलबजावणी करताना सर्व जिल्ह्यांचा आढावा घेवून आवश्यकतेनुसार निधी वितरीत करण्याबाबतची कार्यवाही त्यांचे स्तरावर करावी. तसेच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

४. यावरील खर्च मागणी क्र.के-४, मुख्यलेखाशीर्ष २२३०-कामगार व सेवायोजन, ०१-कामगार, १११ कामगारांसाठी सामाजिक सुरक्षितता, राज्य योजनांतर्गत योजना (००) (१४) बाल कामगार प्रतिबंध अधिनियम,१९८६ (२२३०५८२८) या उपशीर्षाखाली अर्थसंकल्पित केलेल्या निधीतून भागविण्यास शासनाची प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

५. कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी प्रस्तावातील कामांवर प्रचलित कार्यपध्दतीप्रमाणे तसेच यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. यासाठी नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून कामगार आयुक्त कार्यालयाचे संबंधित नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी हे काम पाहतील.

६. सदर शासन निर्णय हा वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७/०४/२०१५ अन्वये प्रस्तुत वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-पहिला, उप विभाग-तीन, अनु.क्र.४, परिच्छेद २७(२) (अ) अन्वये प्रशासनीक विभागाला दिलेल्या अधिकारान्वये तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९ व शासन परिपत्रक, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक अर्थसं-२०१९/२०१९-२०२०/(प्र.क्र.३५) प्रशासन-१, दिनांक १७.०७.२०१९ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००३०२१४४४५९५११० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajendra S
Kaurte

Digitally signed by Rajendra S Kaurte
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368faa24e20d6f8985f510118e6fc1af8b04a443ee8, cn=Rajendra S Kaurte
Date: 2020.03.02 14:59:35 +05'30'

**( रा.शा.कौरते )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) कामगार आयुक्त, कामगार आयुक्त कार्यालय, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा (पुर्व), मुंबई-५१.
(२) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
(३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
(४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
(५) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
(६) उप सचिव (कामगार-४) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
(७) अवर सचिव (प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
(८) निवड नस्ती-कामगार-४